**१५ व्या वित्त आयोगांतर्गत अग्निशमन सेवांचा विस्तार व आधुनिकीकरण यासाठी अर्थसहाय्याची योजना. नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र. ३१ /नवि-०४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १३ मे, २०२४

**संदर्भ :-** नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.अशासे-२०२३/प्र.क्र.८८/नवि-०४, दिनांक १५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राष्ट्रीय आपत्ती प्रतिसादर निधी (NDRF) अंतर्गत सज्जता आणि क्षमता निर्माण निधी खिडकीच्या नियोजीत वाटपातून राज्यांमध्ये “अग्निशमन सेवांचा विस्तार आणि आधुनिकिकरण” योजनेच्या मार्गदर्शक सूचना गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी दिनांक २२.०४.२०२२ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुषंगाने गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी दिनांक ०४.०७.२०२३ अन्वये योजनेचे निकष निश्चित करुन दिनांक ११.०७.२०२३ अन्वये प्रस्ताव सादर करण्याबाबत कळविले आहे. त्याअंतर्गत अग्निशमन सेवांचा विस्तार आणि आधुनिकिकरण यासाठी रु.४,५०० कोटी निधीची योजना सर्व राज्यांकरिता लागू करण्यात आली आहे. प्रस्तुत निधीपैकी लोकसंख्या, क्षेत्रफळ, शहरीकरण याच्याअधारे महाराष्ट्र राज्यासाठी रु.६१५.४८ कोटी (१०.२६%) अर्थसहाय्याची तरतूद करण्यात आलेली आहे. यामध्ये केंद्र शासनाचा हिस्सा ७५% व राज्य शासनाचा हिस्सा २५% आहे. १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशी या सन २०२०-२१ ते २०२५-२६ या कालावधीसाठी असून राज्यांनी सादर केलेल्या प्रस्तावांना मान्यता प्राप्त झाल्यानंतर टप्प्याटप्प्याने निधी उपलब्ध होणार आहे. सदर योजना राबविण्याबाबत संदर्भाधिन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राष्ट्रीय आपत्ती प्रतिसादर निधी (NDRF) अंतर्गत सज्जता आणि क्षमता निर्माण निधी खिडकीच्या नियोजीत वाटपातून राज्यांमध्ये **“अग्निशमन सेवांचा विस्तार आणि आधुनिकिकरण”** ही योजना केंद्र शासनाने मंजूर केलेली आहे. या योजनेसाठी निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी खालीलप्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| मागणी क्र. एफ-२ (F-2) | | | |
|---|---|---|---|
| २२१७ | नगर विकास | 2217 | Urban Development |
| ०५ | इतर नगर विकास योजना | 05 | Other Urban Development Schemes |
| १९१ | नागरी स्थानिक संस्था, नागरी विकास प्राधिकरण,नागरी विकास बोर्ड इत्यादींना सहाय्य | 191 | Assistance to Local Bodies Corporations, Urban Development Authority, Town Improvement Boards etc. |
| ०० | | 00 | |
| (००)(०५) | पंधराव्या वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार राष्ट्रीय आपत्ती | (00)(05) | Grant –in-Aid to Urban Local Bodies for expansion and modernization of fire services in |

| | | | |
|---|---|---|---|
| | प्रतिसाद निधी अंतर्गत राज्यांमध्ये अग्निशमन सेवांचा विस्तार व आधुनिकीकरणसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सहायक अनुदाने (केंद्र हिस्सा ७५ टक्के) | | the States under National Disaster Response Fund as recommendation by the Fifteen Finance Commission (Central Share 75% ) |
| | अनिवार्य/दत्तमत्त (२२१७ B१९७) | | Committed/Voted (2217 B197) |
| | | | |
| (००)(०६) | पंधराव्या वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी अंतर्गत राज्यांमध्ये अग्निशमन सेवांचा विस्तार व आधुनिकीकरणसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सहायक अनुदाने (राज्य हिस्सा २५ टक्के) | (00)(06) | Grant –in-Aid to Urban Local Bodies for expansion and modernization of fire services in the States under National Disaster Response Fund as recommendation by the Fifteen Finance Commission (State Share 25% ) |
| | अनिवार्य/दत्तमत्त (२२१७ B२०३) | | Committed/Voted (2217 B203) |

२. केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वाटपासंदर्भात केंद्र शासनाच्या दि. २३.०३.२०२१ च्या पत्रान्वये विहीत केलेल्या तसेच राज्य शासनाच्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि. ०१.०७.२०२१ अन्वये तसेच केंद्र शासनाच्या दि.०३.०२.२०२३. व दि.१९.०६.२०२३ च्या मार्गदर्शक सुचना तसेच या योजनेबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे तंतोतंत पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२०५/व्यय-३ दि. १९.०४.२०२४ व प्रधान महालेखाकार कार्यालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सं:ख.वि/चा-१/नगर विकास विभाग/युओआर-२०/२०२४-२५/१८६, दि१०.०५.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१३१४२५१२२७२५ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA PARBAT DALVI

Digitally signed by MAHENDRA PARBAT DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e687fdecf6e6c3d1891a03c3515e1681bedf82a21ad79ad6d0b6f7a911a1d3fc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8077AF9533C0322E769EE4FAB8AD782BC365A071F23E8951D686CCFEC4ED1244, cn=MAHENDRA PARBAT DALVI
Date: 2024.05.13 14:38:18 +05'30'

**( महेंद्र दळवी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१०. संचालक, अग्निशमन सेवा, मुंबई
१०. आयुक्त, महानगरपालिका ( सर्व)
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई / नागपुर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व)
१६. सह आयुक्त, नगरपरिषद प्रशासन, जिल्हाधिकारी कार्यालय ( सर्व)
१७. मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपंचायती ( सर्व)
१८. सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव / कक्ष अधिकारी ( सर्व) , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती (नवि-०४)